महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीच्या नाशिक वीजनिर्मिती केंद्रातील संच क्रमांक ३ चे के.एफ.डब्लू. हया जर्मन सांघिक बँकेच्या अर्थसहाय्याने कार्यक्षम सुधारीकरण व आधुनिकीकरण करणे व त्यासाठी शासनाच्या समभाग अर्थसहाय्याला मंजूरी देणे...

**महाराष्ट्र शासन**

उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्र. जसांबँ - २०११/प्र.क्र.२२५/ऊर्जा-३,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २ ऑगस्ट , २०११.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीची वीज निर्मितीची सध्याची स्थापित क्षमता १०७३७ मे.वॅ. असून त्यापैकी औष्णिक केंद्रांची स्थापित क्षमता ७४२५ मे.वॅ. आहे. राज्याची वीज मागणीची कमाल तूट भरून काढण्यासाठी वीज निर्मिती क्षमता ५४९० मे.वॅ. ने वाढविण्याचा कार्यक्रम महानिर्मिती कंपनीने हाती घेतला आहे. त्यासाठी अदयावत यंत्रसामुग्रीने परिपूर्ण असलेल्या नवीन संचांच्या उभारणीबरोबरच कार्यान्वीत असलेल्या संचांचे कार्यक्षम सुधारीकरण व आधुनिकीकरण करून संचांचे आयुर्मान वाढविण्याचे प्रकल्प हाती घेण्यात येत आहेत. औष्णिक वीजनिर्मिती केंद्राच्या आधुनिकीकरणाच्या कार्यक्रमास केंद्र शासनाने देशभर चालना दिली आहे. केंद्रीय विदयुत प्राधिकरणाने (केंद्रीय ऊर्जा मंत्रालयाचे प्रातिनिधिक कार्यालय) कार्यक्षम सुधारीकरण व आधुनिकीकरण प्रकल्पासाठी देशभरातील १८ वीज केंद्रांतील ३४ संचांची निवड केली असून त्यामध्ये महानिर्मिती कंपनीच्या ६ (सहा) संचांचा समावेश करण्यात आला आहे. यात नाशिक वीज निर्मिती केंद्रातील संच क्र. ३ चा समावेश आहे. महानिर्मिती कंपनीच्या २१० मे.वॅ. क्षमतेच्या ११ औष्णिक वीज निर्मिती संचांनी २५ वर्षापेक्षा अधिक सेवा पूर्ण केलेली आहे, हया सर्व संचांचे एका पाठोपाठ एक कार्यक्षम सुधारीकरण व आधुनिकीकरण करण्यात येणार आहे. केंद्र शासनाच्या ऊर्जा व अर्थ मंत्रालयाच्या सहकार्याने ११ व्या पंचवार्षिक योजनेमध्ये महाराष्ट्र शासनाने कार्यक्षम सुधारीकरण व आधुनिकीकरण कार्यक्रमाव्दारे २१० मे.वॅ. क्षमतेच्या ६ (सहा) जुन्या व उपयुक्त आयुर्मान पूर्ण झालेल्या संचांचे पुनर्वसन करून त्या संचांची वीज निर्मिती क्षमता २१५ मे.वॅ. पर्यंत वाढविण्याचे उद्दिष्ट ठेवले आहे.

२.  नाशिक संच क्र. ३ च्या कार्यक्षम सुधारीकरण व आधुनिकीकरण प्रकल्पाची अंदाजित किंमत रु. ४८१.४६ कोटी इतकी आहे. वरील अंदाजित किंमत ही पर्याय "D" निवडीची असून त्यायोगे जनरेटर न बदलता अधिक कार्यक्षम टर्बाइन बसवून संचाची वीज निर्मिती क्षमता २१५ मे.वॅ. पर्यंत वाढविण्यात येणार आहे. वीज निर्मिती क्षमतेमध्ये वाढ होण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीच्या नाशिक वीज निर्मिती केंद्रातील संच क्र. ३ हया २१० मेगावॅट क्षमतेच्या आयुर्मान पूर्ण करून सेवा पूर्ण केलेल्या संचाचे, सदर संचाचा खालावलेला भारांक व वीज निर्मितीतील सातत्यपूर्ण घट या बाबी विचारात घेऊन केंद्रीय विद्युत प्राधिकरणाच्या शिफारशीनुसार व महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या मान्यतेने आणि के.एफ.डब्लू. हया जर्मन सांघिक बँकेच्या अर्थसहाय्याने कार्यक्षम सुधारीकरण व आधुनिकीकरण करण्याचा प्रस्ताव तसेच त्यासाठी शासनाच्या समभाग सहाय्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

- २१० मे.वॅ. क्षमतेच्या नाशिक औष्णिक वीज निर्मिती प्रकल्प संच क्र. ३ च्या कार्यक्षम सुधारीकरण आणि आधुनिकीकरण प्रकल्पाला मंजूरी देण्यात येत आहे.
- नाशिक संच क्र. ३ च्या कार्यक्षम सुधारीकरण आणि आधुनिकीकरण प्रकल्पाला के.एफ.डब्लू. या जर्मन सांघिक बँकेने मंजूर केलेल्या अंदाजे ६५ दशलक्ष युरो (सुमारे रुपये ३८५.१७ कोटी ) इतक्या रकमेच्या कर्जास मान्यता देण्यात येत आहे
- नाशिक औष्णिक वीज निर्मिती प्रकल्प संच क्र. ३ च्या कार्यक्षम सुधारीकरण व आधुनिकीकरण कार्यक्रमासाठी शासनाच्या रु. ९६.२९ कोटी समभाग सहाय्यास मंजूरी देण्यात येत आहे

३.  कर्जाची रक्कम के.एफ.डब्लू. या जर्मन सांघिक बँकेकडून केंद्र शासनाला प्राप्त होईल. केंद्रशासन सदर निधी रक्कम राज्य शासनाला उपलब्ध करून देईल. राज्य शासन निधी महानिर्मिती कंपनीला उपलब्ध करून देईल. कर्जाची परतफेड महानिर्मिती कंपनीकडून राज्य शासन, राज्य शासनाकडून केंद्र शासन आणि केंद्र शासनाकडून के.एफ.डब्लू. या जर्मन सांघिक बँक अशी होईल.

४.  के.एफ.डब्लू. या जर्मन सांघिक बँकेच्या कर्जाच्या अटी व शर्तीनुसार महानिर्मिती कंपनीने सदर कर्जाची परतफेड १५ वर्षामध्ये करावयाची आहे. कर्जाची परतफेड दि. ३०.०६.२०१६ पासून सुरू होईल आणि दि. ३०.१२.२०३० रोजी अंतिम हप्ता देय होईल. बँकेकडून घेण्यात येणा-या कर्जाची वेळेवर पूर्ण परतफेड करण्याची जबाबदारी महानिर्मिती कंपनीची राहील.

५. कर्जाची रक्कम युरोमध्ये परत करावयाची असल्यामुळे युरोच्या दरात होणा-या चढ उतारामुळे होणा-या प्रकल्पाच्या किंमतीतील बदलाची जबाबदारी महानिर्मिती कंपनीची राहील. करारातील अटी व शर्तीनुसार कर्जाच्या वाटपासंदर्भात व अंमलबजावणीसंदर्भात होणारा सर्व खर्च रेमिटन्स व ट्रान्सफर खर्चासह (कन्व्हर्जन फीसह) महानिर्मिती कंपनीने करावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक २५३/व्यय-१६/११, दि.१३.०७.२०११ तसेच अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११७/२०११/अर्थबळ, दि.२५.०७.२०११ अन्वये त्या विभागांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०८०२१३२०१२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,

(कुंदा आ. रेठरेकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
मा. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय
मा. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव मंत्रालयीन विभाग, मुंबई ३२.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी, मर्या. मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, मर्या. मुंबई - ५१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी, मर्या. मुंबई - ५१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी, मर्या. मुंबई - ५१

सचिव, महाराष्ट्र विदयुत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर, १३ वा मजला, कफ परेड, मुंबई
मुख्य अभियंता (विदयुत) सार्वजनिक बांधकाम विभाग, प्रशासकीय इमारत, चेंबूर, मुंबई.
मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे विशेष कार्य अधिकारी
नियोजन विभाग (कार्यासन-१४६२)
वित्त विभाग (व्यय-१६, अर्थबळ)
सर्व मंत्रालयीन विभाग
ऊर्जा प्रभागातील सर्व कार्यासने
अवर सचिव (रोख शाखा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय.
क.अ.(प्रशा-२) उ. ऊ. व का. वि.,त्यांना विनंती करण्यात येते की, सदरहू शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन दयावा.
निवड नस्ती.

---